महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१५/प्र.क्र.१००/२०१५/आस्था-३,**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २७ ऑगस्ट, २०१५.

**शासन आदेश-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि उक्त अधिनियमाच्या कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने या विभागातील श्री.ए.डी. कोल्हे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांची या आदेशान्वये उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद या रिक्त पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

२. श्री.ए.डी. कोल्हे यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक: सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. श्री.ए.डी. कोल्हे यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२७१६०३१६९८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.08.28 11:36:45 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
५. विभागीय आयुक्त, नाशिक
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.जळगांव.
८. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
९. संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.)
१०.कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
११.निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.